# महाभारतसार–परिचय

महाभारत ग्रंथाची योग्यता वर्णन करणें म्हणजे अमृताची गोडी वर्णन करीत बसण्यासारखेंच अनवश्यक आहे. आर्यावर्तातच नव्हे तर आतां महाभारताची महती निरपवाद सर्वमान्य झाली आहे. रशियांतील पंडित अलीकडे महाभारताचें भाषांतर करण्याच्या कामाला अहमहमिकेनें लागले आहेत एवढें सांगितलें म्हणजे त्यात आधुनिक विद्वानांचें मत प्रतिबिंबित होईल.

महाभारत ग्रंथ हा प्राचीन पद्धतीचा ज्ञानकोश आहे. ज्या काळांत हा ग्रंथ तयार झाला त्या काळातील ज्ञान-विज्ञानाची व्याप्ति ल्क्षांत घेतां या ग्रंथाच्या कक्षेंत आला नाहीं असा ज्ञानाचा विषय क्वचितच आढळेल. आधुनिक काळात विज्ञानाची वाढ कल्पनातीत झाली असल्यानें त्यांतला तपशील महाभारतात शोधू पहाणें हें युक्तिक ठरणार नाहीं. तथापि आधुनिक शास्त्राच्या बुडाशीं असलेल्या तत्त्वाचें बीज महाभारतात आढळतें. आधुनिक काळात भौतिक शास्त्रांची वाढ कितीहि झाली असली तरी सृष्टीची उत्पत्ति कशी झाली याविषयीं त्या शास्त्रज्ञांची मति कुंठितच झालेली आहे. विकासवादानें हें कोडें उलगडलें असें कांहीं काळपर्यंत मानलें गेलें; पण विकासवादाचा अपुरेपणा पुढें लक्षात येऊं लागून त्या विकासाच्या मुळाशीं कांहीं गूढ प्रेरणा आहे, असें मत आतां प्रचलित होऊं लागलें आहे. आश्चर्याची व अभिमानाची गोष्ट ही कीं, या विकासवादाच्या बुडाशीं असलेल्या तत्त्वाचाहि विचार महाभारतांत सांख्य प्रक्रियेंत येऊन गेला आहे. सृष्टींतील गूढशक्तींचा शोध करण्याकडे आधुनिक गूढ शास्त्रज्ञानें लक्ष वेधलें आहे. महाभारतांतील योगशास्त्राच्या प्रक्रियेनें या गूढ शक्तींचा ठाव पूर्वीच घेतला आहे.

धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे चार पुरुषार्थ म्हणजे मनुष्यप्राण्याचें संपूर्ण जीवन होय. या चारहि पुरुषार्थांचा विचार महाभारतांत जितका सूक्ष्मपणें केला आहे, तितका सूक्ष्म विचार कोठल्याहि एका आधुनिक ग्रंथात सापडूं शकत नाहीं.

अर्थशास्त्रमिदं प्रोक्तं धर्मशास्त्रमिदं महत् ॥
कामशास्त्रमिदं मोक्तं व्यासेनामितबुद्धिना ॥
इतिहासोत्तमादस्माज्जायन्ते कविबुद्धयः ॥
पञ्चभ्य इव भूतेभ्यो लोकसंविधयस्त्रयः ॥
अनाश्रित्यैदमाख्यानं कथा भुवि न वर्तते ॥
आहारमनपाश्रित्य शरीरस्येव धारणम् ॥
सर्वेषां कविमुख्यानामुपजीव्यो भविष्यति ॥
पर्जन्य इव भूतानामक्षयो भारतद्रुमः ॥
यथा समुद्रो भगवान्यथा मेरुर्महागिरिः ॥
उभौ ख्यातौ रत्ननिधी तथा भारतमुच्यते ॥
धर्मे चार्थे च कामेच मोक्षे च भरतर्षभ ॥
यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत्क्वचित् ॥

अशा प्रकारें ज्या महाग्रंथाची थोरवी प्रतिज्ञापूर्वक गाइली गेली, त्याची वाखाणणी आधुनिक लेखकांनीं कितीहि केली तरी ती अपुरीच ठरेल, हें निश्चित आहे.

असा हा ज्ञानाचा अपूर्व ठेवा आपल्या देशांत आपणास गीर्वाण भाषेंतून लाभला आहे. संस्कृतभाषानभिज्ञांसहि त्या ज्ञानाचा आस्वाद घेता यावा म्हणून कित्येक देशी भाषांतून या ग्रंथाचीं रूपांतरें झालीं आहेत. इंग्रजी भाषेंत याचें भाषांतर कित्येक वर्षांपूर्वीच झालें असून आधुनिक युरोपीय भाषांतून याच्या भाषांतराचे प्रयत्न होत आहेत.

अशा प्रकारें भाषांतरित महाभारत आपल्या हातीं आलें तरी त्यात मूळ महाभारताची मधुरता जशाची तशी उतरत नाहीं. हरिद्वारच्या गंगेचें पाणी आणि काशींतल्या गंगेचें पाणी यांत जसें महदंतर असतें तसेंच महदंतर मूळ महाभारत आणि त्याची देशी भाषांतून हातीं येणारी प्रतिकृति यांत असतें. यास्तव महाभारताची अवीट गोडी मूळांतूनच चाखावी अशी हुरहुर मनाला लागून राहणें स्वाभाविक आहे. परंतु सांप्रतच्या विमानवेगानें भरारी मारणाऱ्या जीवनक्रमांत एक लक्ष मूळ ग्रंथ वाचण्याइतकी फुरसत ज्यांना लाभेल ते महाभाग्यवान गणले गेले पाहिजेत. हें भाग्य ज्यांच्या भाळीं लिहिलें नसेल त्यांची सर्वतोपरी निराशा होऊं नये

म्हणून महाभारताचा मुख्य धागा तुटूं न देतां त्याचा संक्षिप्त सारांश मूळ संस्कृतांतूनच वाचकांच्या हातीं देण्याची कल्पना मनांत उद्भवून कै. भारताचार्य चिंतामणराव वैद्य यांनीं ५२ वर्षांपूर्वीच असा प्रयत्न केला आणि '*संक्षिप्तमहाभारतम्*' हा ग्रंथ छापून प्रसिद्ध केला. तो इतका लोकप्रिय झाला कीं, सात वर्षांनीं त्याची दुसरी आवृत्ति निघाली आणि पुढें तीनच वर्षांच्या अवधींत त्याची तिसरी आवृत्ति निघाली.

त्याच सुमारास चिपळूणकर आणि मंडळींनीं महाभारताचें समग्र भाषांतर मराठींत छापून काढण्याला प्रारंभ केला आणि हे भाषांतराचे भाग संपूर्ण छापून होतांच कै. भारताचार्य नानासाहेब वैद्य यांच्याकडून 'महाभारताचा उपसंहार' मराठींत लिहून घेऊन प्रसिद्ध केला. हा उपसंहार इतका विद्वत्ताप्रचुर आणि सर्वार्थबोधक झाला आहे कीं, त्या उपसंहारानेंच कांहीं काळपर्यंत महाभारतालाच मागें सारलें. तथापि फोटो जवळ बाळगल्यानें जशी त्या व्यक्तीच्या समागमाची तहान भागत नाहीं, उलट त्या व्यक्तीच्या प्रत्यक्ष संगतीची उत्सुकता द्विगुणित होते, त्याप्रमाणें या 'महाभारताच्या उपसंहारानें' महाभारत मूळांतूनच वाचण्याची उत्सुकता वाढीला लागली. वाचकांची ही अपेक्षा लक्षांत घेऊन येथील चित्रशाळा प्रेसच्या चालकांनीं समग्र महाभारत, नुसतें मूलमात्र नव्हे, तर नीलकंठी टीका व संपादक पं. किंजवडेशास्त्री यांची मार्मिक व मार्गदर्शक सूचि, यांच्यासह छापून प्रसिद्ध केलें.

हरिवंशासह हा प्रचंड ग्रंथ एक लक्ष श्लोकांहूनहि थोडा अधिकच विस्ताराचा आहे, आणि त्याची किंमतहि किमानपक्ष ६० रुपये आहे. एवढें मूल्य देऊन ग्रंथ खरेदी करणारे ग्राहक कितीसे असणार आणि या समग्र ग्रंथाचें आलोडन करण्याइतकें मनःस्वास्थ्य किती जणांना लाभणार ? ज्या कीर्तनकारांचा व प्रवचनकारांचा व्यवसाय या महाभारतावर अवलंबून आहे त्यांतलेहि सर्वजण या प्रचंड ग्रंथाचें आमूलाग्र अवलोकन न करितां, आपल्या जरूरीपुरत्या मधल्या मधल्या कथा चाळून पाहून तेवढ्यावरच आपलें काम भागवितात. मग इतरांच्याविषयीं सांगावयासच नको.

अशा परिस्थितीत वाचकाची ही अडचण दूर करून त्यांची ज्ञान-पिपासा अशात तरी भागविण्याच्या दृष्टीनें पुसदचे धर्मप्रेमी श्रीयुत शंकरराव सरनाईक यांच्या मनांत ' महाभारतसार ' हा ग्रंथ प्रसिद्ध करावा अशी कल्पना उद्भवली आणि त्यांना त्या कार्याला सत्पात्र असें सहाय्य कहि मिळाले, असा हा त्रिवेणी संगम जमल्यामुळें ' महाभारतसार 'रूपी प्रयागांत अवगाहन करण्याचें भाग्य वाचकांना लाभत आहे. कै. चिंतामणराव वैद्यांचें ' संक्षिप्त महाभारतम् ' दुर्मिळ झाल्यानें तर या ' महाभारतसाराची ' आवश्यकता होतीच होती, पण त्यापेक्षाहि या ' महाभारतसारा 'त कित्येक सुधारणा समाविष्ट केल्यानें हा ग्रंथ वाचकांच्या विशेष आदरास प्राप्त होईल वैद्यांच्या ' संक्षिप्त महाभारता 'पेक्षां 'महाभारतसारा'तील श्लोकसंख्या जवळजवळ दीडपट आहे. संक्षिप्त महाभारतांतली एकंदर श्लोकसंख्या सुमारें आठ हजार भरली तर या महाभारतसारात साडेबारा हजार श्लोक घेण्यांत येत आहेत. प्रस्तुतच्या भागांत उद्योगपर्वअखेर पांचच पर्वें समाविष्ट झालीं आहेत. या पांच पर्वांचीच दोन्ही संक्षेपांची तुलना केल्यास हें विधान अधिक स्पष्ट होईल. आदिपर्वांत ७६८ च्या ऐवजीं १३६९, सभापर्वांत ४६७ च्या जागीं ५९२, वनपर्वांत १३६२ च्या जागीं १७४२, विराटपर्वांत ३६९ च्या ऐवजीं ४१४ आणि उद्योगपर्वांत तर ६१५ च्या जागीं ८७८ इतके श्लोक या भारतसारांत घेतले आहेत या पहिल्या भागांतली एकूण श्लोकसंख्या ४९९५ आहे यावरून वाचकांना महाभारताचा अधिक विस्तृत सारांश प्रस्तुतच्या ग्रंथानें मिळत आहे, हें उघड आहे. पण यापेक्षां दुसरी महत्त्वाची सोय म्हणजे प्रकरणवार मथळे देणें आणि सारांश घेतांना तो कोणत्या अध्यायांतून घेतला हें नमूद करणें ही होय. वैद्यांच्या संक्षिप्त महाभारतांत, कोणता संक्षिप्त भाग मूळ महाभारतांतल्या कोणत्या अध्यायांतून घेतला तें समजण्याला साधन नाहीं, आणि कोणताहि संक्षिप्त भाग काढून वाचूं लागल्यास हा वृत्तान्त कोणत्या प्रकरणांतला आहे हें समजण्यालाहि सुलभ साधन नाहीं.

प्रस्तुतच्या ' महाभारतसारांत ' या दोन्ही उणीवा भरून काढल्या आहेत. प्रत्येक प्रकरणाला कथादर्शक मथळा दिला आहे, आणि संक्षिप्त

भागाच्या बाजूला मूळ भारतातील कोणत्या अध्यायाचा तो संक्षेप आहे, तें नमूद करून ठेवलेलें आहे यामुळें हा संक्षेप वाचीत असताना जर कोठें संदर्भ नीट लक्षांत न आला, तर मुळातील तो तो अध्याय काढून पाहता येतो. त्याशिवाय जेथें संवादाचा संक्षेप दिला असेल तेथें तें तें भाषण कोणा व्यक्तींचें आहे, तें समजण्याकरिता त्या व्यक्तींचीं नावेंहि श्लोकाच्या प्रारंभीं एका बाजूला दिलीं आहेत. यामुळें कोणत्या विषयावर कोणाकोणामध्यें संवाद चालला आहे तें चटकन ध्यानांत येतें.

आदिपर्वांत प्रास्ताविक भारतोपक्रमानंतर आस्तीकजन्मापासून कथेला प्रारंभ केला आहे. पुढें अध्याय ६३ मधील उपरिचर राजाच्या कथेपासून 'वैशंपायनकथित भारताला' सुरवात होते. सौतीनें कोणकोणत्या कथांचा विस्तार करून अथवा नवीनच उपकथा घालून वैशंपायनाच्या भारताला महाभारताचें स्वरूप दिलें, हें जाणण्याला साधन नाहीं. केवळ तर्कशास्त्राच्या जोरावर कै. नानासाहेब वैद्य यांनीं सौतीने कोणती भर टाकली, याविषयीं विवेचन केलें आहे. तथापि, किती झालें तरी तें अनुमानच शोध. त्याला निश्चित प्रमाण मानता येत नाहीं. मूळचा जय ग्रंथ ८ हजार श्लोकाचा होता, त्याचा तिप्पट विस्तार करून वैशपायनानें २४ हजार श्लोकांचें भारत तयार केलें आणि सौतीनें त्याचें शतसहस्रसंहितात्मक महाभारत केलें, अशी प्रचलित समजूत आहे. आतां वाढीचा क्रम संपून संक्षेप करण्याचा उपक्रम चालू झाला आहे ! या उपक्रमांत आपण नेमके वैशपायनाचे २४ हजार श्लोक शोधून काढू, किंवा व्यास महर्षींच्या मूळच्या जयग्रंथाचा भाग वेगळा करू, अशी महत्त्वाकांक्षा मनात धरल्यास तें ध्येय साध्य झालें अशी खात्री कोण देऊ शकेल ?

प्रस्तुतच्या 'सारग्रंथांत' सुमारे १२ ते १३ हजार श्लोकांचा समावेश होईल, म्हणजे यांत वैशपायनाच्या संहितेचा अर्धा भागच येऊ शकेल. तरी पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, या संक्षेपातहि कित्येक उपकथांचा समावेश झाला आहे व त्या उपकथा सौतीच्या हातच्या आहेत याविषयीं संशय नाहीं. एतावता या भारतसारातहि व्यासमहर्षि, वैशपायन व सौति या तिघांच्याहि कृतींची थोड्याबहुत प्रमाणात सरमिसळ असणारच. आंबेमोहर तांदूळ, कामशाळ व रगूनचे तांदूळ एकत्र झालेल्या एका मणाच्या

पोत्यातून, दोन पायली आबमोहर तांदूळ वेगळे काढून त्याचा भात करून वाढा, असें जर एखाद्या अत्यंत कुशल गृहिणीला सांगितलें, तर तें असें तिलाहि अशक्य होईल, तसाच प्रकार महाभारतांतील श्लोकांची निवड करण्यांतहि होणार केवळ व्यासाचे, किंवा केवळ वैशंपायनाचे श्लोक निवडून काढण्याची प्रतिज्ञा करून जरी एखादा पंडित या कामास लागला, तरी त्यालाहि शेवटीं हात टेकावेच लागतील. हें इतकें स्पष्ट करण्यातला हेतु एवढाच कीं, हा 'महाभारतसार' ग्रंथ म्हणजे केवळ जयग्रंथाचा, किंबहुना वैशंपायनाच्या भारताचाहि संक्षेप नसून तो सौतीच्या महाभारताचा संक्षेप आहे असें मान्य करण्यांत सौतीच्या कृतीचा अधिक्षेप नसून उलट गौरवच आहे कारण सौतीनें अनेक ठिकाणीं जी भर घातली आहे, ती सहेतुक असून ती आवश्यकच होती आणि ती भर त्यानें इतक्या कुशलतेनें घातली आहे कीं, भाषेच्या किंवा संदर्भाच्या दृष्टीनें तींत वैगुण्य न दिसता, उलट कित्येक ठिकाणीं मूळ ग्रंथाचा तिच्यामुळें शोभा वाढलीच आहे

आदिपर्वांत शांतनूच्या जन्मापासून लाक्षागृहदाहापर्यंतच्या मुख्य कथा कथन केल्यानंतर पुढें परिशिष्ट रूपानें उपकथा जोडल्या आहेत. त्यांत १ शिष्यपरीक्षा, २ शकुन्तलोपाख्यान, ३ कचदेवयानी उपाख्यान, ४ ययात्युपाख्यान, ५ अणीमाण्डव्य उपाख्यान, ६ विश्वामित्रकृत धेनुहरण, ७ सुन्दोपसुन्दोपाख्यान अशीं सात उपाख्यानें आहेत.

सभापर्वांत मयसभेच्या वर्णनापासून तो पांडवांच्या वनवासाभिगमनापर्यंतचा मुख्य कथाभाग असून परिशिष्टांत १ जरासन्धजन्म, २ शिशुपालजन्म अशा अवघ्या दोनच उपकथा आहेत.

वनपर्वांत पांडवांच्या काम्यक वनगमनापासून तो यक्षप्रश्न अखेरपर्यंतचा मुख्य कथाभाग असून तेथून पुढें १ उर्वशीशाप, २ अगस्त्योपाख्यान, ३ गंगावतरणम्, ४ पतिव्रतामाहात्म्य, ५ द्रौपदी सत्यभामा संवाद, ६ मुद्गलोपाख्यान इतकी उपाख्यानें आहेत

विराटपर्वांत धौम्यमहर्षीच्या उपदेशापासून तो कीचकवध, गोग्रहण, अभिमन्युविवाह इत्यादि कथा असून या पर्वांत उपाख्यानें मुळींच नाहींत.

उद्योगपर्वांत अभिमन्यूच्या विवाहोत्तर भरलेल्या राजकारणाच्या *चर्चेच्या सभेपासून सुरुवात होऊन, रणांगणावर सैन्यांच्या व्यूहरचनेपर्यं*-तच्या तयारीचें वर्णन आहे. हें पर्व सगळ्या महाभारतांत अत्यंत महत्त्वाचें आहे. यांत शत्रूशीं वागावयाच्या साम, दाम, भेद, दंड अशा 'चतुर्विध धोरणाचा अति मार्मिक विचार केलेला असून शिष्टाईतील मुत्सद्देगिरीचा उत्कृष्ट नमुना यांत चित्रित केला आहे. या राजकारणाच्या बरोबरीनेंच विदुरानें उपदेशिलेली व कसल्याहि प्रसंगांत उपयोगी पडणारी अशी सामान्य व्यावहारिक नीति विस्तारानें वर्णिली असून तिलाच सनत्सु-जातीच्या तोंडच्या वेदांतपर उपदेशाची जोड दिली आहे. अशा रीतीनें धर्म, अर्थ, काम, मोक्ष अशा चारहि पुरुषार्थांचा विचार या पर्वांत एकत्र आला असल्यानें हें पर्व सर्वांत श्रेष्ठ ठरतें.

या पर्वांतून १ प्रल्हादाची सत्यनिष्ठा आणि २ बैडालव्रत अशा दोन उपकथा 'महाभारतसारांत' दिल्या आहेत. 'अंबोपाख्यान' हें भारत-कारांनींच उपाख्यान म्हणून संबोधिलें आहे. तथापि त्या उपाख्यानाचा *मूळकथेच्या सदर्भाशीं अति निकटचा संबंध आहे.* असें असूनहि त्याचा समावेश मूळांतहि नाहीं आणि उपाख्यानांतहि नाहीं. त्यामुळें भीष्मवधाची कथा अपांत्री राहते.

'महाभारतसार' या ग्रंथाचें हें त्रोटकरूपानें दिग्दर्शन झालें. मूळ-*ग्रंथाचा संदर्भ न सुटतां आणि महत्त्वाचा भाग न गाळतां* सारांश सांगा-वयाचा म्हणजे मोठी तारांबळ उडते. कोणतें घेऊं व कोणतें गाळूं, हें ठरविणें मोठें मुष्किलीचें काम असतें. महाभारतांत त्याज्य असा भाग क्वचित्च असल्यानें कोणताहि भाग गाळावयाचा म्हणजे अगदीं जिवावर येतें. पण थोडें तरी मन घट्ट केल्याशिवाय संक्षेप साधणार कसा? अर्था-त्च अगदीं आवश्यक वाटणारा असा भागहि वगळला सारावा लागतो. अशी निवडानिवड करतांना सर्वांचें मत सारखेंच पडेल असें नाहीं. तथापि 'महाभारतसार' हें 'संक्षिप्तभारतं' पेक्षां दीडपटीनें मोठें असल्या-कारणानें त्यांत बरेच ठिकाणीं अधिक तपशील आला आहे. उदाहरणार्थ, *विराटपर्वांत 'संक्षिप्तभारता'नें 'जीमूत मल्लवधा'चा* उल्लेख देखील गाळला हें युक्त वाटत नाहीं. महाभारतसारांत ती लढत वर्णिली आहे.

पोत्यातून, दोन पायली आवेमोहर तांदूळ वेगळे काढून त्याचा भात करून घाढा, असें जर एखाद्या अत्यंत कुशल गृहिणीला सांगितलें, तर तें जसें तिलाहि अशक्य होईल, तसाच प्रकार महाभारतातील श्लोकांची निवड करण्यातहि होणार. केवळ व्यासाचे, किंवा केवळ वैशंपायनाचे श्लोक निवडून काढण्याची प्रतिज्ञा करून जरी एखादा पंडित या कामास लागला, तरी त्यालाहि शेवटीं हात टेकावेच लागतील. हें इतकें स्पष्ट करण्याचा हेतु एवढाच कीं, हा 'महाभारतसार' ग्रंथ म्हणजे केवळ जयग्रंथाचा, किंबहुना वैशंपायनाच्या भारताचाहि संक्षेप नसून तो सौतीच्या महाभारताचा संक्षेप आहे. असें मान्य करण्यात सौतीच्या कृतीचा अधिक्षेप नसून उलट गौरवच आहे. कारण सौतीनें अनेक ठिकाणीं जी भर घातली आहे, ती सहेतुक असून ती आवश्यकच होती आणि ती भर त्यानें इतक्या कुशलतेनें घातली आहे कीं, भाषेच्या किंवा संदर्भाच्या दृष्टीनें तींत वैगुण्य न दिसतां, उलट कित्येक ठिकाणीं मूळ ग्रंथाची तिच्यामुळें शोभा वाढलीच आहे.

आदिपर्वांत शान्तनूच्या जन्मापासून खांडवदाहापर्यंतच्या मुख्य कथा कथन केल्यानंतर पुढें परिशिष्ट रूपानें उपकथा जोडल्या आहेत. त्यांत १ शिष्यपरीक्षा, २ शकुन्तलोपाख्यान, ३ कचदेवयानी उपाख्यान, ४ ययात्युपाख्यान, ५ अणीमाण्डव्य उपाख्यान, ६ विश्वामित्रकृत धेनुहरण, ७ सुन्दोपसुन्दोपाख्यान अशीं सात उपाख्यानें आहेत.

सभापर्वांत मयसभेच्या वर्णनापासून तो पांडवांच्या वनवासाभिगमनापर्यंतचा मुख्य कथाभाग असून परिशिष्टांत १ जरासन्धजन्म, २ शिशुपालजन्म अशा अवघ्या दोनच उपकथा आहेत.

वनपर्वांत पांडवांच्या काम्यक वनगमनापासून तो यक्षप्रश्न अखेरपर्यंतचा मुख्य कथाभाग असून तेथून पुढें १ उर्वशीशाप, २ अगस्त्योपाख्यान, ३ गंगावतरणम्, ४ पतिव्रतामाहात्म्य, ५ द्रौपदी सत्यभामा संवाद, ६ मुद्‌गलोपाख्यान इतकीं उपाख्यानें आहेत.

विराटपर्वांत धौम्यमहर्षींच्या उपदेशापासून तों कीचकवध, गोग्रहण, अभिमन्युविवाह इत्यादि कथा असून या पर्वांत उपाख्यानें मुळींच नाहींत.

उद्योगपर्वांत अभिमन्यूच्या विवाहोत्तर भरलेल्या राजकारणाच्या चर्चेच्या सभेपासून सुरवात होऊन, रणांगणावर सैन्यांच्या व्यूहरचनेपर्यंतच्या तयारीचें वर्णन आहे. हें पर्व सगळ्या महाभारतांत अत्यंत महत्त्वाचें आहे. यांत शत्रूशीं वागावयाच्या साम, दाम, भेद, दंड अशा 'चतुर्विध धोरणाचा अति मार्मिक विचार केलेला असून शिष्टाईतील मुत्सद्देगिरीचा उत्कृष्ट नमुना यांत चित्रित केला आहे. या राजकारणाच्या बरोबरीनेंच विदुरानें उपदेशिलेली व कसल्याहि प्रसंगांत उपयोगी पडणारी अशी सामान्य व्यावहारिक नीति विस्तारानें वर्णिली असून तिलाच सनत्सुजातीच्या तोंडच्या वेदांतपर उपदेशाची जोड दिली आहे. अशा रीतीनें धर्म, अर्थ, काम, मोक्ष अशा चारहि पुरुषार्थांचा विचार या पर्वांत एकत्र आला असल्यानें हें पर्व सर्वांत श्रेष्ठ ठरतें.

या पर्वांतून १ प्रल्हादाची सत्यनिष्ठा आणि २ बैडालव्रत अशा दोन उपकथा 'महाभारतसारांत' दिल्या आहेत. 'अंबोपाख्यान' हें भारतकारांनींच उपाख्यान म्हणून संबोधिलें आहे. तथापि त्या उपाख्यानाचा मूळकथेच्या सदर्भाशीं अति निकटचा संबंध आहे. असें असूनहि त्याचा समावेश मूळांतहि नाहीं आणि उपाख्यानातहि नाहीं. त्यामुळें भीष्मवधाची कथा अधांत्री राहते.

'महाभारतसार' या ग्रंथाचें हें त्रोटकरूपानें दिग्दर्शन झालें. मूळग्रंथाचा संदर्भ न सुटतां आणि महत्त्वाचा भाग न गाळतां सारांश सांगावयाचा म्हणजे मोठी तारांबळ उडते. कोणतें घेऊं व कोणतें गाळू, हें ठरविणें मोठें मुष्किलीचें काम असतें. महाभारतांत त्याज्य असा भाग क्वचित्‌च असल्यानें कोणताहि भाग गाळावयाचा म्हणजे अगदीं जिवावर येतें. पण थोडें तरी मन घट्ट केल्याशिवाय संक्षेप साधणार कसा? अर्थात्‌च अगदीं आवश्यक वाटणारा असा भागहि बाजूला सारावा लागतो. अशी निवडानिवड करतांना सर्वांचें मत सारखेंच पडेल असें नाहीं. तथापि 'महाभारतसार' हें 'संक्षिप्तभारत' पेक्षां दीडपटीनें मोठें असल्याकारणानें त्यांत बरेच ठिकाणीं अधिक तपशील आला आहे. उदाहरणार्थ, विराटपर्वांत 'संक्षिप्तभारता'नें 'जीमूत मल्लवधा'चा उल्लेख देखील गाळला हें युक्त वाटत नाहीं. महाभारतसारांत ती लढत वर्णिली आहे.

पोत्यातून, दोन पायली आधेमोहर तांदूळ वेगळे काढून त्याचा भात करून वाढा, असें जर एखाद्या अत्यंत कुशल गृहिणीला सांगितलें, तर तें असें तिलाहि अशक्य होईल, तसाच प्रकार महाभारतांतील श्लोकांची निवड करण्यातहि होणार केवळ व्यासाचे, किंवा केवळ वैशंपायनाचे श्लोक निवडून काढण्याची प्रतिज्ञा करून जरी एखादा पंडित या कामास लागला, तरी त्यालाहि शेवटीं हात टेकावेच लागतील. हें इतकें स्पष्ट करण्यांतला हेतु एवढाच कीं, हा 'महाभारतसार' ग्रंथ म्हणजे केवळ जयग्रंथाचा, किंबहुना वैशंपायनाच्या भारताचाहि संक्षेप नसून तो सौतीच्या महाभारताचा संक्षेप आहे. असें मान्य करण्यांत सौतीच्या कृतीचा अधिक्षेप नसून उलट गौरवच आहे कारण सौतीनें अनेक ठिकाणीं जी भर घातली आहे, ती सहेतुक असून ती आवश्यकच होती आणि ती भर त्यानें इतक्या कुशलतेनें घातली आहे कीं, भापेच्या किंवा सदर्भाच्या दृष्टीनें तींत वैगुण्य न दिसता, उलट कित्येक ठिकाणीं मूळ ग्रंथाची तिच्यामुळें शोभा वाढलीच आहे

आदिपर्वांत शान्तनूच्या जन्मापासून खांडवदाहापर्यंतच्या मुख्य कथा कथन केल्यानंतर पुढें परिशिष्ट रूपानें उपकथा जोडल्या आहेत. त्यांत १ शिष्यपरीक्षा, २ शकुन्तलोपाख्यान, ३ कचदेवयानी उपाख्यान, ४ ययात्युपाख्यान, ५ अणीमाण्डव्य उपाख्यान, ६ विश्वामित्रकृत धेनुहरण, ७ सुन्दोपसुन्दोपाख्यान अशीं सात उपाख्यानें आहेत.

सभापर्वांत मयसभेच्या वर्णनापासून तों पांडवांच्या वनवासाभिगमनापर्यंतचा मुख्य कथाभाग असून परिशिष्टांत १ जरासन्धजन्म, २ शिशुपालजन्म अशा अवघ्या दोनच उपकथा आहेत.

वनपर्वांत पांडवांच्या काम्यक वनगमनापासून तो यक्षप्रश्न अखेरपर्यंतचा मुख्य कथाभाग असून तेथून पुढें १ उर्वशीशाप, २ अगस्त्योपाख्यान, ३ गंगावतरणम्, ४ पतिव्रतामाहात्म्य, ५ द्रौपदी सत्यभामा संवाद, ६ मुद्गलोपाख्यान इतकीं उपाख्यानें आहेत.

विराटपर्वांत धौम्यमहर्षींच्या उपदेशापासून तों कीचकवध, गोग्रहण, अभिमन्युविवाह इत्यादि कथा असून या पर्वांत उपाख्यानें मुळींच नाहींत.

उद्योगपर्वात अभिमन्यूच्या विवाहोत्तर भरलेल्या राजकारणाच्या चर्चेच्या सभेपासून सुरुवात होऊन, रणांगणावर सैन्यांच्या व्यूहरचनेपर्यंतच्या तयारीचें वर्णन आहे. हें पर्व सगळ्या महाभारतात अत्यंत महत्त्वाचें आहे. यांत शत्रूशीं वागावयाच्या साम, दाम, भेद, दंड अशा चतुर्विध धोरणाचा अति मार्मिक विचार केलेला असून शिष्टाईतील मुत्सद्देगिरीचा उत्कृष्ट नमुना यांत चित्रित केला आहे. या राजकारणाच्या बरोबरीनेंच विदुरानें उपदेशिलेली व कसल्याहि प्रसंगांत उपयोगी पडणारी अशी सामान्य व्यावहारिक नीति विस्तारानें वर्णिली असून तिलाच सनत्सुजातीच्या तोंडच्या वेदांतपर उपदेशाची जोड दिली आहे. अशा रीतीनें धर्म, अर्थ, काम, मोक्ष अशा चारहि पुरुषार्थांचा विचार या पर्वांत एकत्र आला असल्यानें हें पर्व सर्वांत श्रेष्ठ ठरतें.

या पर्वातून १ प्रल्हादाची सत्यनिष्ठा आणि २ बैडालव्रत अशा दोन उपकथा ' महाभारतसारात ' दिल्या आहेत. ' अंबोपाख्यान ' हें भारतकारानींच उपाख्यान म्हणून संबोधिलें आहे तथापि त्या उपाख्यानाचा मूळकथेच्या संदर्भाशीं अति निकटचा संबंध आहे. असें असूनहि त्याचा समावेश मूळांतहि नाहीं आणि उपाख्यानातहि नाहीं. त्यामुळें भीष्मवधाची कथा अर्धांशी राहवे.

' महाभारतसार ' या ग्रंथाचें हें थोटकरूपानें दिग्दर्शन झालें. मूळग्रंथाचा संदर्भ न सुटतां आणि महत्त्वाचा भाग न गाळता सारांश सांगावयाचा म्हणजे मोठी तारांबळ उडते. कोणतें घेऊ व कोणतें गाळू, हें ठरविणें मोठें मुष्किलीचें काम असतें. महाभारतांत त्याज्य असा भाग क्वचित्च असल्यानें कोणताहि भाग गाळावयाचा म्हणजे अगदीं जिवावर येतें. पण थोडें तरी मन घट्ट केल्याशिवाय संक्षेप साधणार कसा ? अर्थात्च अगदीं आवश्यक वाटणारा असा भागहि बाजूला सारावा लागतो. अशी निवडानिवड करतांना सर्वांचें मत सारखेंच पडेल असें नाहीं. तथापि ' महाभारतसार ' हें ' संक्षिप्तभारतं ' पेक्षां दीडपटीनें मोठें असल्याकारणानें त्यांत बरेच ठिकाणीं अधिक तपशील आला आहे. उदाहरणार्थ, विराटपर्वांत ' संक्षिप्तभारता'नें ' जीमूत मल्लवधा'चा उल्लेख देखील गाळला हें युक्त वाटत नाहीं. महाभारतसारांत ती लढत वर्णिली आहे.

उलट पक्षीं ' महाभारतसारात ' धौम्याच्या उपदेशाचा भाग वर्णिताना दोन महत्त्वाचे श्लोक गाळले आहेत राजाच्या आश्रितानीं कसें वागावें हें सांगत असता त्यांतले सगळे महत्त्वाचे मुद्दे न गाळता घेणें अवश्यक होतें उदाहरणार्थ—

अन्यस्मिन्प्रेष्यमाणे तु पुरस्तात्स्यात् समुत्पतेत् ॥
अहं किं करवाणीति स राजवसतिं वसेत् ॥
मानं वस्त्रमलंकारं यच्चान्यत्संप्रयच्छति ॥
तदेव धारयेन्नित्यं एवं प्रियतरो भवेत् ॥

यातील महत्त्वाचें तत्त्व सार्वकालिक उपयोगाचें आहे, म्हणून मुद्दाम त्याचा आवर्जून उल्लेख करीत आहें नुसत्या राजसेवकांनींच नव्हे तर घरचीं मुलें, विद्यार्थी, स्वयंसेवक या सर्वांनीच हे नियम पाळले तरच ते वरिष्ठांच्या कृपेला पात्र होतात अगात इतर गुण असूनहि हें तत्त्व न सांभाळल्यानें त्या व्यक्ति मर्जीतून उतरतात, असें न व्हावें या करितां धौम्य महर्षींचा समग्रबोध, त्यांतून एकहि श्लोक न गाळता, वाचकांच्या मनांत ठसविणें आवश्यक आहे हाच न्याय सभापर्वांतील 'कच्चिन्नीति' आणि आदिपर्वांतील ' कणिक नीति ' यांना लागू आहे 'संक्षिप्तभारतांत' कच्चिन्नीति बरीच विस्तृत दिली आहे, पण ' महाभारतसारात ' तिचा बराच संकोच झालेला दिसतो उलटपक्षीं ' संक्षिप्तभारतात ' कणिक नीतींतला—

आशां कालवतीं कुर्यात्कालं विघ्नेन योजयेत् ॥
विघ्नं निमित्ततो ब्रूयान्निमित्तं चापि हेतुतः ॥

हा महत्त्वाचा श्लोक कसा गाळला गेला कळत नाहीं असो, अशा प्रकारें अगदीं सूक्ष्म दृष्टि लावून या संक्षेपाकडे पाहून त्याशिवायचें नाहीं महाभारतांतले महत्त्वाचे प्रसंग आणि त्या प्रसंगानुरोधानें केलेला महत्त्वाचा बोध हा न गाळता, महाभारताचें सगळें सार या संक्षेपात आल्यानें, ज्यांना समग्र भारत वाचण्याला कालानुकूलता नसेल त्यांना महाभारत वाचल्याचें श्रेय या ' महाभारतसारा 'च्या वाचनानें खात्रीनें प्राप्त होईल.

महाभारतातील कथा जुन्यापुराण्या असल्या तरी त्यात ग्रथित केलेलें

तत्वज्ञान जुनें पुराणें, टाकाऊ असें मुळींच होण्यासारखें नाहीं. कालिदासानें उत्कृष्ट सौंदर्याची कल्पना देताना ' प्रतिक्षणयन्नवतामुपैति ' असें त्याचें वर्णन केलें आहे. तत्वज्ञानालाहि हीच कसोटी लावल्यास महाभारतांतील तत्त्वज्ञान या कसोटीला उतरू शकेल. हें तत्त्वज्ञान जुनें, बुरसटलेलें तर होत नाहींच. पण नव्या नव्या कल्पना आपल्या दृष्टीपुढें आल्यास, महाभारतांत हीच कल्पना पूर्वी सांगितली आहे, अशी प्रचीति त्या नव्या कल्पनेच्या दृष्टीनें नीट अर्थ लावल्यास आल्याविना रहात नाहीं. महाभारतांत वनस्पतींना ज्ञानभावना आहे, ही कल्पना पूर्वी—' तस्मात्पश्यन्ति पादपा । ' ' तस्माच्छृण्वन्ति पादपा ' इत्यादि वाक्यें वाचूनहि मनांत पटत नव्हती. सर जगदीशचंद्र बोस यांनी आपले प्रयोग करून दाखविल्यापासून त्या श्लोकाचा अर्थ कळून, हें तत्त्व व्यासमहर्षींनीं पूर्वींच जाणलें होतें, याची प्रतीति आल्यानें कौतुक वाटतें.

नवीन भासणारें ज्ञान, महाभारताच्या वाचनानें, जुनें व आपलेंच असल्याचें मनांत ठिंबून जसें कौतुक वाटतें, तसाच उलट बाजूनेंहि एक फायदा होतो. समानस्वास्थ्याच्या आणि सौम्यवादाच्या म्हणून ज्या कित्येक नव्या कल्पना आपल्याला आकर्षक वाटून मोह पडतात, त्या कल्पना पूर्वी अनुभव घेऊनच त्याज्य ठरविल्या गेल्या आहेत, असें प्रत्ययास आल्यानें सावधगिरीचा इषारा मिळतो समाज एकवर्णी, वर्णविहीन करण्याचा अट्टाहास आज कित्येकांनीं चालविला आहे. पण वर्णव्यवस्था लावण्याच्या पूर्वी समाज वर्णविहीनच होता त्या समाजाचा उत्कर्ष होईना, अर्थात्‌च तसा कटु अनुभव आल्यावरच समाजांत वर्णव्यवस्था निर्माण करण्यांत आली तेव्हा जो मार्ग चुकीचा व श्रेयोविरोधी ठरला, त्याच मार्गानें जाण्याचा पुनश्च हट्ट धरून पूर्वी पडलेल्या खड्ड्यांतच पुनश्च पडण्याचा हट्ट कां धरावा, असा विचार महाभारतांतील बोधापासून मनाला पटेल.

हें तात्त्विक विवेचन सोडून राजनीतिशास्त्रांतील व्यवहारासंबंधीं विचार केला तरी तोच प्रत्यय येतो लोकशाही पद्धतीचा कितीहि 'उदो उदो' केला गेला तरी, तज्ज्ञांच्या सल्लामसलतीनें चालणारी नियंत्रित राज्यपद्धतीच खरोखर सुखावह व चिरस्थायी होते, हा महाभारताचा अनुभवच आपणांला

मान्य करावा लागेल राज्याच्या व समाजाच्या आर्थिक सुस्थितीसाठीं अनेक उपाय हल्लीं सुचविले जात आहेत त्यांत भांडवलशाहीच्या उपयुक्ततेची मर्यादा कोणती, राज्यसंस्थेनें कर कोणते, किती प्रमाणांत केव्हां वसूल करावेत, आयातनिर्यात व्यापारावर कोणतीं बंधनें घातलीं असतां तीं हितकारक होतात, व कोणतीं बंधनें उलट अपायकारक होतात, काळाबाजार बंद करण्याला उपाय कोणते योजावे, किंमतीवर नियंत्रण कसें ठेवावें, अनाथ व अपंग यांचें धारणपोषण कोणीं व कसें करावें इत्यादि अनेक गोष्टींसंबंधाचें अनुभवसिद्ध धडे त्यांत मिळतील. त्याच्याबरोबर समाजाच्या चालीरीतींत आणि व्यक्तिमात्राला सन्मार्गाचें वळण लावण्यांत राजानें कायद्याच्या रूपानें किती ढवळाढवळ करावी आणि समाजाला सन्मार्गाला लावण्याचें प्रभावी साधन कायदा का धर्म, याचा विचारहि महाभारतांत उत्तम रीतीनें करून त्या दोहोंचा परस्परांशीं मेळ कसा घालावा, हेंहि सांगितलें आहे एकट्या कायद्यानें काम भागत नाहीं आणि एकट्या धर्मानेंहि कार्य सफल होत नाहीं, यास्तव त्या दोहोंचा यथाप्रमाण समन्वय व्हावा, कोणताहि कायदा धर्मविरोधी नसावा आणि कोणताहि धर्म व्यवहारविरोधी नसावा असाच निष्कर्ष महाभारताच्या वाचनापासून मनावर ठसतो त्याचा बोध हल्लींचे राज्यकर्ते घेतील तर त्याच्या निधर्मी कायद्याची अशी दुर्दशा होणार नाहीं.

शास्त्रीय शोध करून करून हैड्रोजन बॉंब तयार केले, आता त्याच्यावर बंदी कशी घालावा याच्या विचारानें मुत्सद्दी आपले मेंदू शिणवीत आहेत धर्माच्या मानसिक बंधनाविना हें कार्य कसें साधणार ? महाभारतकाळीं असेंच सर्वसंहारी नारायणास्त्र अवगत होतें अर्जुनाच्या तें स्वाधीन असूनहि, त्यानें धर्मभावना पाळून त्याचा प्रयोग केला नाहीं तामसीवृत्तीच्या अश्वत्थाम्यानें त्याचा प्रयोग केल्यानें महा अनर्थ ओढवला पण अखेरीस त्याचा दुष्परिणाम त्याला स्वतःलाच भोगावा लागला यापासून किती तरी बोध घेण्यासारखा आहे राष्ट्राराष्ट्रांनीं एकमेकावर हेरगिरी करून हायड्रोजन बॉंबला आळा बसणार नाहीं मानवी प्राण्यावर त्याचा प्रयोग करणें हा अधर्म आहे, त्यांत राष्ट्राचाच घात आहे, ही गोष्ट मनाला पटली पाहिजे, तरच मानवी समाज निर्भय राहील

असो. महाभारत हा उपदेशपर रत्नांनीं भरलेला महासागर आहे. त्यातून ध्यावीं तितकीं रत्नें थोडींच वाटणार. तरीपण पाणबुड्याला आपला आवाका सांभाळून कितीतरी रत्नें काढून घेता येतील, अशी सोय काहीं खाड्यांतून व सामुद्रधुन्यांतून असते. संक्षिप्त महाभारत म्हणजे महाभारत रूपी महासागराची एक सोयीस्कर खाडीच आहे. ज्याना अगाध महासागरात बुडी मारून रत्नें हस्तगत करून घेण्याचें सामर्थ्य नसेल, त्याच्या सोयीसाठीं 'महाभारतसार' रूपी हें एक निर्भय स्थान निर्माण करण्यात आलें आहे. ज्याना अल्पस्वल्प कालावधीच अशा वाचनाकडे देता येतो, ज्याचें संस्कृत भाषेचें अध्ययन वेताग्रातांचेंच आहे, ज्याना आर्थिक मर्यादेमुळें समग्र महाभारत ग्रंथ विकत घेण्याची सोय नाहीं, अशा विविध वर्गांतील वाचकाना हा 'महाभारतसार' ग्रंथ मानसिक समाधानाबरोबरच ज्ञानविज्ञान प्राप्त करून देईल.

श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथकोटिभिः ॥

असें म्हणून सगळ्या महाभारताचें सार—

'परोपकार' पुण्याय पापाय परपीडनम् '

एवढ्या अर्ध्या श्लोकातहि सांगण्यात येतें. पण ही अतिशयोक्तीची परिसीमा झाली. केवळ एवढा अर्धा श्लोक वाचून व पाठ करून सर्वांच्या मनावर सुपरिणाम होत असता तर विस्तृत ग्रंथ लिहिण्याची जरूरीच नव्हती. व्यास महर्षींनींहि तीन वर्षे सतत जागरण करून 'जय' ग्रंथ तयार केला नसता आणि वैशंपायन व सौति यांनींहि मूळ ग्रंथात एकापुढें एक अशी भर घातली नसती. एवढे परिश्रम त्याना त्या काळीं आवश्यक वाटले तरी, सध्याच्या परिस्थितीला अनुसरून आणि 'शास्त्रें फार अपार जीवित तुझें अल्पल्पकी मानवा' ही उक्ति लक्षांत ठेवून प्रस्तुतच्या ग्रंथाच्या संपादकानीं योग्य मर्यादा ठरवून हा संक्षेप केला आहे. त्याचा पहिल्या पाच पर्वांचा हा पहिला भाग सध्या प्रसिद्ध होत आहे. वाचकाना हें कार्य पसंत पडलेलें दिसतांच दुसराहि भाग प्रसिद्ध होईल.

तो दुसरा भाग प्रसिद्ध करण्यापूर्वी एक सूचना मात्र करावीशी वाटते, ती ही कीं, मुख्य कथेतून उपाख्यानें वेगळीं न काढता, तीं मुळांत जेथें

असतील तेथेंच त्याचाहि साराश द्यावा म्हणजे सदर्भ तुटत नाहीं आणि कथाभाग अधिक स्पष्ट होतो उपाख्यानें शेवटीं दिल्यानें तीं कोणत्या सदर्भात सागितलीं गेलीं हें तेथें न समजल्यानें त्या उपाख्यानाचें महत्त्व नीट मनात ठसत नाहीं आणि उपाख्यान मूळच्या सदर्भात गाळल्यानें तेथल्या भागातील विचाराचा धागाहि तुटल्यानें सगति लागत नाहीं.

आदिपर्वातील शकुतलाख्यान आणि ययाति शर्मिष्ठाख्यान हीं तर उपपर्वें नसून मुख्य वशवर्णनातलाच तो एक आवश्यक कथाभाग आहे. सभापर्वातील जरासध व शिशुपाल याच्या जन्मकथाचा व त्याच्या वधाचा मुख्य कथाभागाशीं न तोडता येणारा असा निकट सबध आहे यास्तव त्या उपकथा त्या ठिकाणीं दिल्या असत्या तर ठीक झालें असतें.

वनपर्वातल्या बहुतेक कथा उपख्यानाच्या स्वरूपाच्याच आहेत असें असूनहि नलोपाख्यान, सावित्री आख्यान इत्यादि कथा मुख्य कथाभागात समाविष्ट केल्या आहेत आणि उर्वशीच्या शापाचा मुख्य कथानकाशीं दृढ सबध असून ती कथा उपकथेंत लोटली आहे! यावरून हें दिसून येईल कीं, मुख्य कथा आणि उपाख्यानें याची निवड करणें कठीण आहे. त्या सबधात सर्वांचें एकमत होण्याचा सभव कमी. पण इतकी भानगड करण्यापेक्षा, जो उपकथा द्यावयाची असेल ती जेथल्या तेथेंच दिलेली काय वाईट? उपकथा वेगळी, शेवटीं, दिल्यानें कांहीं पानाची व जागेची बचत होते, असे नाहीं जागेचा व्याप सारखाच व छपाईचे परिश्रम सारखेच मग ही निवडानिवड करण्यात मेंदू व्यर्थ कशासाठीं शिणवावा? त्यापेक्षा जी उपकथा द्यावयाचीच असेल ती जागच्या जागींच देणें बरें नव्हे काय?

असो या 'महाभारतसार' ग्रथाचें आणखी एक वैशिष्ट्य सागणें आवश्यक आहे महाभारताची एकदर कथा थोडक्यात समजून येईल असा गद्यमय साराश मराठींत व हिंदींत अशा दोन भाषातून यात दिलेला आहे त्यामुळें हें पुस्तक या देशातील सर्वच भारतातील वाचकाना सग्रहणीय असे झालें आहे. मूळ साराश सस्कृतात असून ती भाषा तर सर्व हिंदुस्थानभर मान्यता पाव लेलीच आहे पण त्याचबरोबर महाभारतीय कथेचा त्रोटक वृत्तान्त

मराठी व हिंदी या दोन भाषांतून दिल्यानें, आणि हिंदी ही आतां राष्ट्रभाषा झाली असल्यानें, हें पुस्तक वाचून महाभारताच्या कथेचा परिचय सर्वांना आपल्या परिचयाच्या भाषेतून करून घेता येईल. अशा परिचय झाल्यावर संस्कृत भाषेतून मूळ कथा समजून घ्यावी अशी जिज्ञासा उत्पन्न होईल व त्यायोगानें संस्कृत भाषेच्या अध्ययनाची प्रथा वाढत जाईल.

*संस्कृत भाषेतल्या या महान् राष्ट्रीय ग्रंथाची थोरवी आता पाश्चात्य* राष्ट्रांतल्या विद्वानांनाहि पटू लागली आहे. रशियासारख्या आधुनिक विचाराच्या राष्ट्रांतहि आता महाभारताचें भाषांतर करण्याचा उद्योग चालू आहे. अशा वेळीं भारतातीलच बहुसंख्य पदवीधरांना महाभारत ग्रंथाचा परिचय नसावा ही गोष्ट लाजिरवाणी आहे. यास्तव भरतखंडातील *सर्व विद्यापीठांनीं संस्कृत भाषेच्या अध्ययनाची सोय* आपआपल्या क्षेत्रात करावी आणि संस्कृत भाषेच्या अध्ययनात 'महाभारतसारा' सारखा ग्रंथ अवश्य अभ्यसनीय ग्रन्थांत समाविष्ट करावा. राजकारणात, विशेषतः परराष्ट्रीय राजकारणात, वागणाऱ्या अधिकाऱ्यांना तर या ग्रंथाच्या अध्ययनाची अटच आवश्यक म्हणून ठेवण्यास हरकत नाहीं.

अशा रीतीनें हा 'महाभारतसारग्रंथ' सर्वोपयुक्त आहे. धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थांपैकीं कोणत्याहि पुरुषार्थाच्या लाभासाठीं या ग्रंथाचें अध्ययन अगदीं अवश्यक आहे. कै. चिंतामणराव वैद्य (भारताचार्य) यांनीं संक्षिप्त भारत ग्रंथ प्रसिद्ध करून वाचकांची अशी चांगली सोय करून ठेवली होती. त्या ग्रन्थाच्या सर्व आवृत्त्या संपून जाऊन सध्यां त्या ग्रंथाची प्रत दुर्मिळ झाली आहे. यावरूनच वाचकांना तो ग्रंथ किती आदरणीय वाटला याचें अनुमान करितां येतें. ही दुर्मिळता या प्रस्तुतच्या ग्रंथानें दूर होऊन नव्या पिढींतील वाचकांची चांगली सोय करून दिल्याबद्दल या कल्पनेचे मूळ प्रेरक श्रीयुत शंकरराव रारनाईक यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत. त्याचबरोबर महाभारत ग्रंथाचें मंथन करून त्यातून हें 'सार' काढून तें वाचकाच्या हातीं देण्याचें मोठ्या परिश्रमाचें काम उत्तमरीतीनें पार पाडल्याबद्दल संपादकांचेहि वाचकांवर

मोठे उपकार आहेत अशा या परिश्रमाचें योग्य चीज वाचकांकडून होईल अशी अपेक्षा आहे अशा कामीं संस्कृताचें अध्ययन अध्यापन जेथे जेथें चालतें अशीं विद्यापीठें व पाठशाळा यानीं या ग्रंथाची संस्कृत पाठ्य-पुस्तकांत नियुक्ति करून, या अभ्यासाला चालना दिली पाहिजे आत्म-हिताचें श्रेयस्कर असें कर्तव्य देखील प्रेरकशक्तीच्या टोंचणीखेरीज आपण होऊन आंगिकारावायचें नाहीं, असेंच जणू काय, सांप्रतच्या युगाचें लक्षण होऊं पाहत आहे याकरितांच महाभारत सारामृताचें सेवन करा, असें सांगण्याचा खटाटोप करावा लागत आहे तो सफळ होऊन प्रस्तुत ग्रंथाच्या संपादकाच्या परिश्रमाचें चीज होवो एवढीच प्रार्थना आहे

पुणें, मिति आषाढ शु॥ ११<br>
शके १८७६

ज स करंदीकर

---

# प्रस्तावनायाः संस्कृतसारांशः

श्री. विद्वद्वर्य ज. स. करन्दीकरमहाशयैः महाराष्ट्रभाषया लिखितायाः महाभारततत्त्वपरिचयाख्यप्रस्तावनायाः संस्कृतभाषानिबद्धः सारांशः—

महाभारतस्य महत्त्ववर्णनममृतस्य माधुर्यवर्णनमिवानावश्यकमेव। न केवलमार्यावर्ते किन्तु त्रिखण्डपृथिवीतले सर्वत्र महाभारतस्य महत्त्वं साम्प्रतं सर्वसम्मतं विद्यते। रशियन् पण्डिताः सम्प्रति महाभारतस्य भाषान्तरकरणेऽहमहमिकया संलग्नाः सन्तीत्येतावतैवाधुनिकविद्वज्जनानां महाभारतविषयकं मतं ज्ञातुं शक्यते।

अथ महाभारतग्रन्थः प्राचीनपद्धत्या लिखितो ज्ञानकोश एवास्ति। यस्मिन्काले एतद्ग्रन्थनिबन्धनं सञ्जातं तत्कालीनज्ञानविज्ञानव्याप्तिं निरीक्ष्य, अनेन ग्रन्थेनास्पृष्टो नैकोऽपि ज्ञानविषयोऽस्तीति सुस्पष्टमेव विदुषाम्। साम्प्रतिके समये सञ्जाताया विज्ञानवृद्धेरङ्गोपाङ्गाना महाभारते अन्वेषणं न युक्तिसह स्यात्। तथापि आधुनिकशास्त्राणां मूलभूततत्त्वानां बीजं महाभारते दृश्यते एव। साम्प्रतं भौतिकशास्त्राणां कल्पनातीतवृद्धौ सत्यामपि 'इयं विसृष्टिः कुत आबभूव' इत्येतस्मिन्विषये भौतिकशास्त्रज्ञाना मतिः कुण्ठितैव विद्यते। 'विकासवादेन अयं विषयः सुस्पष्टः स्यात्' इति किञ्चित्कालपर्यन्तं विद्वन्मतमासीत्। परं विकासवादस्य अपूर्णतां लक्षयित्वा विकासस्य मूलभूता काचिद् गूढप्रेरणा वर्तते इति मतं सम्प्रति प्रचलितं विद्यते।

अयमाश्चर्यस्य अभिमानस्य च विषयो यदस्य विकासवादस्य मूलभूततत्त्वाना विमर्शः साङ्ख्यप्रक्रियावर्णनावसरे महाभारतग्रन्थे सुस्पष्टतया कृतो दृश्यते। सृष्टिस्थगूढशक्तीनामन्वेषणे साम्प्रतिका गूढशास्त्रज्ञा दत्तचित्ता दृश्यन्ते। किन्तु महाभारते योगशास्त्रप्रक्रियायां तासां गूढशक्तीनां वर्णनं पूर्वमेव कृतं विद्यते।

धर्मार्थकाममोक्षाख्यचतुर्विधपुरुषार्थसम्पादनेन मानवस्य जीवनं संपूर्णं भवति। तेषां पुरुषार्थानां विचारः सूक्ष्मतया महाभारते यादृशः कृतोऽस्ति, तादृशः कस्मिन्नप्याधुनिके ग्रन्थे न दृष्टिगोचरतामापद्यते।

अर्थशास्त्रमिदं प्रोक्तं धर्मशास्त्रमिदं महत् ॥
कामशास्त्रमिदं प्रोक्तं व्यासेनामितबुद्धिना ॥
इतिहासोत्तमादस्माज्जायन्ते कविबुद्धयः ॥
पञ्चभ्य इव भूतेभ्यो लोकसंविधयस्त्रयः ॥
अनाश्रित्यैदमाख्यानं कथा भुवि न वर्तते ॥
आहारमनपाश्रित्य शरीरस्येव धारणम् ॥
सर्वेषां कविमुख्यानामुपजीव्यो भविष्यति ॥
पर्जन्य इव भूतानामक्षयो भारतद्रुमः ॥
यथा समुद्रो भगवान्यथा मेरुर्महागिरिः ॥
उभौ ख्यातौ रत्ननिधी तथा भारतमुच्यते ॥
धर्मे चार्थे च कामे च मोक्षे च भरतर्षभ ॥
यदिहास्ति तदन्यत्र यन्नेहास्ति न तत्क्वचित् ॥

एवंप्रकारेण यस्य महाग्रन्थस्य गौरवं प्रतिज्ञापूर्वकं गीतमस्ति, तस्य प्रशंसा आधुनिकलेखकैरनेकप्रकारैः कृतापि सा अपूर्णैव स्यादिति निश्चितमेव ।

अस्मद्देशे गीर्वाणवाण्या उपनिबद्धः ईदृशोऽयमपूर्वज्ञाननिधिरस्माभिः परम्परया प्राप्तोऽस्ति । संस्कृतभाषानभिज्ञाना तज्ज्ञानरसास्वादनार्थं देशभाषासु तस्य ग्रन्थस्य रूपान्तराणि समभूवन् । आङ्ग्लभाषया अस्य भाषान्तरं कतिचिद्वर्षेभ्यः प्राक् समभवत् । आधुनिकयुरोपीयभाषासु अस्य भाषान्तरस्य प्रयत्नाः सम्प्रति भवन्त्येव ।

एवंप्रकारेण भाषान्तरितं महाभारतं यद्यपि अस्मद्धस्तप्राप्यं सञ्जातं तथापि मूलमहाभारतस्य माधुर्यं तेनैव रूपेण भाषान्तरे नावतरति । हरिद्वारक्षेत्रस्थे वाराणसीक्षेत्रस्थे च गङ्गोदके यादृशं महदन्तरं विद्यते तादृशमेव महदन्तरं मूलमहाभारते भाषान्तरिततत्प्रतिकृतौ च विद्यते । अतः महाभारतस्य नित्यनवं माधुर्यं मूलतः एव आस्वादनीयमित्युत्सुकता रसिकमनसि स्वभावत एव प्रादुर्भवति । परं साम्प्रतिके विमानवेगेन उड्डीयमाने जीवनक्रमे एकलक्षश्लोकसंमितमूलग्रन्थवाचनपर्याप्तावसरः कैश्चिन्महाभाग्यवद्भिरेव लभ्यते । तद्भाग्यं येषां निटिले लिखितं न विद्यते, तेषां सर्वतः निराशा न भवतु इत्येतदर्थं महाभारतस्य अत्रुटितं कथासूत्रं सङ्क्षिप्तरूपेण मूलश्लोकैरेव

वाचकहस्ते समर्पणीयमिति मनीषया द्विपञ्चाशत्संवत्सरेभ्यः पूर्वमेव कै. भारताचार्यचिन्तामणिवैद्यमहाशयैरीदृशः प्रयत्नः कृत', सङ्क्षिप्तमहाभारताख्यग्रन्थ' मुद्रयित्वा प्रसिद्धिं नीतश्च । स ग्रन्थः इयाल्लोकप्रियः सञ्जातः यत् सप्तवर्षैस्तस्य द्वितीयावृत्तिस्तदनन्तर वर्षनयेणैव तृतीयावृत्तिः प्रसिद्धा अभवत् ।

अस्मिन्नेव समये चिपळूणकरमण्डलेन महाभारतस्य समग्र भाषान्तर महाराष्ट्रभाषया समारब्धम् । तस्य सम्पूर्णप्रकाशनानन्तरमेव कै. भारताचार्यवैद्यमहाशयैर्लिखितः महाभारतस्य उपसहार' महाराष्ट्रभाषायामेव प्रसिद्धि नीतः । अयमुपसहारः एव विद्वत्ताप्रचुरः सर्वार्थबोधकश्च सञ्जातोऽस्ति, यत्तेनोपसहारेण कञ्चित्काल यावन्मूलमहाभारतमपि अपसारितमिव कृतम् । तथापि यथा छायाचित्रलाभेऽपि यस्य छायाचित्र तत्समागमेच्छा न निवर्तते, प्रत्युत वर्धत एव एवमेव अनेन महाभारतोपसहारेण मूलमहाभारतवाचनोत्कण्ठा वृद्धिमेव गता । वाचकानामिमामुत्कण्ठा लक्षयित्वा पुण्यपत्तनस्यचित्रशालामुद्रणालयसञ्चालकैः समग्र महाभारत न मूलमात्रमेव किन्तु नीलकण्ठीटीकया, सम्पादकपण्डितकिंजवडेकरशास्त्रिमहाशयाना मार्गदर्शकसूच्या च समेत मुद्रयित्वा प्रकाशितम् ।

हरिवशेन सह अय ग्रन्थः एकलक्षाधिकश्लोकैः समन्वितः अतीव विस्तृतोऽस्ति । तस्य मूल्यमपि न्यूनातिन्यून षष्टिरूप्यकमित विद्यते । एतावता महता मूल्येन ग्रन्थक्रेतारः कियन्त. स्यु' ? । तस्य समग्रग्रन्थस्य अध्ययनार्थं मनःस्वास्थ्य च कियन्तो लभेरन् ? । येषा कीर्तनकाराणा प्रवचनकाराणा च व्यवसायः महाभारतोपजीवी विद्यते तेऽपि सर्व समग्र महाभारतमनवलोक्यावश्यकभागमेव निरीक्ष्य तावतैव स्वकार्यं साधयन्ति । इतरेषा कथा तु न वक्तव्यैव ।

एतादृश्यां परिस्थित्या वाचकानामन्तरायस्य दूरीकरणार्थं तेषा ज्ञानपिपासायाः अशत प्रशमनार्थं च पुष्पपुरी ( पुसद ) निवासिना धर्मप्रेमिणा श्रीयुतशकररावसरनाईकमहोदयानां मनसि महाभारतसारग्रन्थस्य प्रकाशनेच्छा समुत्पन्ना तस्मिन्कार्ये सत्सहायकाश्च तैर्लब्धाः । अस्मादृशायमुनासमागमयोगात् इदानीं महाभारतसारप्रयागे अवगाहनभाग्य वाचकैर्लभ्यते ।

कै. चिन्तामणिरावमहाशयाना सङ्क्षिप्तमहाभारतस्य दुर्लभत्वादस्य महाभारतसारस्य आवश्यकता आसीदेव। किन्तु सङ्क्षिप्तमहाभारतापेक्षया अस्मिन्महाभारतसारे कतिपयसुधारणाना समावेशात् अय ग्रन्थो वाचकाना-मादरार्हो भविष्यति। वैद्यमहाशयाना सङ्क्षिप्तभारतापेक्षया महाभारत-सारस्य श्लोकसङ्ख्या सार्धाधिका वर्तते। प्रथमस्य श्लोकसङ्ख्या यदि ८००० भवेत्तर्हि द्वितीयस्य १२५०० भविष्यति।

प्रस्तुतेऽस्मिन्महाभारतसारस्य प्रथमे भागे उद्योगपर्वान्तानि पञ्च पर्वाणि सङ्गृहीतानि सन्ति। एतत्पर्वपञ्चकस्य द्वयोः सङ्क्षेपयोस्तुलनया अय विषयो विशदीभविष्यति।

| | सङ्क्षिप्तमहाभारतम्<br>श्लोकसङ्ख्या | महाभारतसारः<br>श्लोकसङ्ख्या |
|---|---|---|
| आदिपर्व– | ७६८ | १३६९ |
| सभापर्व– | ४६७ | ५९२ |
| वनपर्व- | १३६२ | १७४२ |
| विराटपर्व– | ३६९ | ४१४ |
| उद्योगपर्व– | ६१५ | ८७८ |
| | ३,५८१ | ४,९९५ |

अनया तुलनया स्पष्ट प्रतीयते यत् सङ्क्षिप्तभारतापेक्षया प्रस्तुतग्रन्थेन महाभारतस्य विस्तृतसारांशो वाचकैरुपलभ्यते। अपिच प्रतिप्रकरण तत्तत्प्रकरणस्य नामनिर्देशः, यस्मादध्यायाच्छ्लोकाः सङ्गृहीतास्तदध्यायाङ्क-निर्देशश्च अस्य महाभारतसारस्य अपर विशेषद्वय वर्तते। वैद्यमहाशयाना सङ्क्षिप्तमहाभारते कतमो भागः कस्मादध्यायाद्गृहीतः कतमो वृत्तान्तः कस्मात्प्रकरणात्सङ्गृहीतश्च इति ज्ञानस्य साधन नास्ति। पर प्रस्तुते महा-भारतसारे इद न्यूनताद्वय समीकृत विद्यते।

अस्मिन्ग्रन्थे प्रतिप्रकरण कथादर्शक शीर्षक, श्लोकवामभागे मूलमहा-भारतस्य अध्यायाङ्कश्च निर्दिष्टोऽस्ति। अपिच सवादस्थले सवादकर्तृनाम-

निर्देशः तत्र तत्र श्लोकवामभागे कृतोऽस्ति । अनया व्यवस्थया कस्मिन्विषये केषां संवादः प्रस्तुतोऽस्तीति झटिति ज्ञायते ।

आदिपर्वणि प्रास्ताविकभारतोपक्रमानन्तरमास्तीकजन्मप्रभृति कथा समारब्धा । अतः परं ६३ अध्याये उपरिचरराजकथातः वैशम्पायनकथितभारतस्य प्रारम्भः सञ्जातः। वैशम्पायनकथितस्य भारतस्य महाभारतीकरणार्थं सौतिना काश्च कथाना विस्तरः कृतः, का वा नूतनाः कथाः प्रक्षिप्ताः, तत् निश्चितसाधनाभावात् ज्ञातुं न शक्यते । श्री. वैद्यमहाशयैः केवलतर्काश्रयेण यत्सौतिकृतप्रक्षेपस्य विवेचनं कृतं तत्प्रमाणपदवीमारोढुं नार्हति ।

व्यासमहर्षेर्मूलजयग्रन्थः अष्टसहस्रश्लोकसम्मितः आसीत् । तस्य त्रिगुणं विस्तरं कृत्वा वैशम्पायनेन चतुर्विंशतिसहस्रश्लोकपरिमितो भारतग्रन्थः विरचितः । सौतिना च भारतस्य एकलक्षश्लोकात्मकं महाभारतं कृतमिति साम्प्रतं विद्वज्जनानां धारणास्ति ।

सोऽयं वृद्धिक्रमः समाप्तिं गतवान् । अधुना सङ्क्षेपस्य उपक्रमः प्रारब्धोऽस्ति । अस्मिन्नुपक्रमे वैशम्पायनस्य २४ सहस्रश्लोकानामन्वेषणं करिष्यामि व्यासमहर्षेर्वा मूलजयग्रन्थभागं पृथक्करिष्यामीति महत्त्वाकाङ्क्षा सिद्धिं गतेति वक्तुं कः शक्नुयात् ? ।

अस्मिन्सारग्रन्थे १२।१३ सहस्रश्लोकानां सङ्ग्रहो भविष्यति । सः वैशम्पायनकृतभारतस्य अर्धांश एव भवेत् । वस्तुतस्तु अस्मिन्सङ्क्षेपे उपकथानां समावेशात्, उपकथानां सौतिप्रक्षिप्तत्वे विद्वज्जनानां संशयाभावात्, व्यासमहर्षेः वैशम्पायनस्य सौतेश्च कृतीनां न्यूनाधिकप्रमाणेन मिश्रणमस्मिन्ग्रन्थे निश्चितमेवास्ति ।

उत्तममध्यमाधमतण्डुलाना मिश्रराशितः उत्तमतण्डुलानामेव पृथक्करणं यथा सुकुशलेनापि जनेन कर्तुमशक्यं तद्वदेव महाभारतश्लोकानामपि प्रकारोऽस्ति । केवलं व्यासमहर्षेः केवलं वैशम्पायनस्य वा श्लोकानां पृथक्करणं करिष्यामीति प्रतिज्ञाय यदि कश्चित्पण्डितस्तत्कार्ये सक्षमः स्यात्तर्हि तस्य तूष्णींभवनमेव परिणामो भवेत् । अस्य स्पष्टीकरणस्य इदमेव तात्पर्यं यदस्मिन्महाभारतसारे न केवलं जयग्रन्थस्य नापि केवलं वैशम्पायनीयभारतस्य किन्तु सौतिकृत महाभारतस्यैव सङ्क्षेपोऽस्ति ।

अनेन कथनेन न सौतिकृतेरधिक्षेपोऽभिप्रेतः किन्तु तद्गौरवमेवाभिप्रेतमस्ति। यतः सौतिना कृतः प्रक्षेपः सहेतुकः आवश्यकश्चासीत्। अपिच स प्रक्षेपः इयता कौशल्येन कृतोऽस्ति यद् भाषादृष्ट्या प्रकरणदृष्ट्या च न तत्र वैगुण्यमापतति प्रत्युत अनेकेषु स्थलेषु मूलग्रन्थस्य शोभा प्रक्षेपेण वृद्धिं गतास्ति।

आदिपर्वणि शान्तनुजन्मारभ्य खाण्डवदाहपर्यन्त मुख्यकथाकथनानन्तर परिशिष्टरूपेण उपकथाः सङ्गृहीताः सन्ति। ताश्च १ शिष्यपरीक्षा, २ शकुन्तलोपाख्यानम्, ३ कचदेवयान्युपाख्यानम्, ४ ययात्युपाख्यानम्, ५ अणीमाण्डव्योपाख्यानम्, ६ विश्वामित्रकृत धेनुहरणम्, ७ सुन्दोपसुन्दोपाख्यानं चेति सप्तसङ्ख्याकाः सन्ति।

सभापर्वणि मयसभावर्णनमारभ्य पाण्डवाना वनवासाभिगमनपर्यन्तो मुख्यकथाभागः, परिशिष्टे च १ जरासन्धजन्म, २ शिशुपालजन्म चेति उपकथाद्वयमेवास्ति।

वनपर्वणि पाण्डवाना काम्यकगमनात्प्रभृति यक्षप्रश्नपर्यन्तो मुख्यकथाभागः, अन्ते १ उर्वशीशापः, २ अगस्त्योपाख्यानम्, ३ गङ्गावतरणम्, ४ पतिव्रतामाहात्म्यम्, ५ द्रौपदीसत्यभामासवादः, ६ मुद्गलोपाख्यानचेति षडुपाख्यानानि सङ्गृहीतानि सन्ति।

विराटपर्वणि धौम्यमहर्षिकृतमुपदेशमारभ्य कीचकवधः, गोग्रहणम्, अभिमन्युविवाहान्ता मुख्यकथा एव विद्यते। नास्मिन्पर्वणि उपाख्यानानि सन्ति।

उद्योगपर्वणि अभिमन्युविवाहोत्तरं सन्धिविग्रहविचारार्थी सभामारभ्य रणभूमौ सेनानिवेशपर्यन्ताया कथाया वर्णनमस्ति। इदमुद्योगपर्व समग्रमहाभारते सारभूत विद्यते। रिपुणा सह कथ वर्तितव्यम्, साम दान-भेद-दण्डाना प्रयोगः कथ कुत्र च कर्तव्यः इत्येतत्सूक्ष्मतयात्र वर्णितमस्ति। श्रीकृष्णस्य दौत्यप्रसङ्गेन मन्त्रकौशल्यमुत्कृष्टतया चित्रितम्। अनेन सहैव व्यवहारे सर्वावस्थोपयोगिनी विदुरनीतिः, सनत्सुजातमुखेन वेदान्तोपदेशश्च अस्मिन्नेव पर्वणि विद्यते। एवच धर्मार्थकाममोक्षाख्यचतुर्विधपुरुषार्थानां विवरणमस्मिन्पर्वणि एकत्र उपलभ्यते। अतः इद पर्व सर्वपर्वसु श्रेष्ठमस्ति।

अस्मिन्पर्वणि १ प्रह्लादस्य सत्यनिष्ठा, २ वैडालव्रत चेति उपकथाद्वयं सङ्गृहीतमस्ति । अम्बोपाख्यान भारते उपाख्यानमेव वर्तते । परं मुख्यकथया नेदिष्ठसम्बन्धात्तस्य अवश्यसङ्ग्राह्यत्वेऽपि अस्मिन्ग्रन्थे असङ्गृहीतत्वात् भीष्मवधप्रसङ्ग' निर्हेतुक इव भवति ।

महाभारतसारग्रन्थस्य इद विहङ्गमदर्शन कृतम् । कथासूत्रमपरित्यज्य सारवद्भाग चापरिहृत्य विस्तृतग्रन्थस्य साराशसङ्ग्रहः कठिनतर एव । महाभारते त्याज्यभागस्य अल्पीयस्त्वात्किं ग्राह्य किं त्याज्यमिति संशयाकुल भवति चेतः । मनःकाठिन्य विना सङ्क्षेपो न सम्भवति । अतः क्वचिदावश्यकभागोऽपि परिहर्तव्यो भवति । एतादृशसङ्क्षेपे सर्वेषा मतैक्यमशक्यमेव । तथापि महाभारतसारे सङ्क्षिप्तभारतापेक्षया बहुषु स्थलेषु कथाधिक्यं दृश्यते । यथा विराटपर्वणि सङ्क्षिप्तभारते जीमूतमल्लवधस्य अनुल्लेखः एव । महाभारतसारग्रन्थे सा कथा सङ्गृहीतास्ति । तथापि सर्वकालोपयुक्तमुपदेश कुर्वता धौम्यऋषिणा राजसेवकवर्तनोपदेशे यच्छ्लोकद्वय कथितं तदस्मिन्महाभारतसारे न गृहीतम् । उदाहरणम्—

> अन्यस्मिन्प्रेष्यमाणे तु पुरस्ताद्यः समुत्पतेत् ॥
> अह किं करवाणीति स राजवसतिं वसेत् ॥
> मान वस्त्रमलङ्कार यच्चान्यत्सम्प्रयच्छति ॥
> तदेव धारयेन्नित्यमेव प्रियतरो भवेत् ॥

एतच्छ्लोकद्वयोक्तनियमाः न केवलं राजसेवकैरेव किन्तु गृहे बालकैः, पाठशालासु छात्रैः, समाजे स्वयसेवकैश्च अवश्य परिपालनीयाः । तेन ते सर्वेषां कृपापात्राणि भवेयुः । अन्यथा इतरगुणसत्त्वेपि एतद्गुणाभावे ते बालकादय' अप्रिया भवन्ति । अतः धौम्यकृतोपदेशः एकमपि श्लोकमपरित्यज्य समग्र एव वाचकज्ञानार्थमवश्य सङ्ग्रहीतव्य' । अयमेव न्यायः सभापर्वस्थकणिकनीतौ आदिपर्वस्थकणिकनीतौ च बोद्धव्यः ।

सङ्क्षिप्तमहाभारते कणिकनीतिः विस्तृतास्ति महाभारतसारे तु तस्याः सङ्कोचो दृश्यते । सङ्क्षिप्तमहाभारते च कणिकनीतिस्थः—

> *आशां कालवतीं कुर्यात्काल विघ्नेन योजयेत् ॥*
> विघ्न निमित्ततो ब्रूयान्निमित्त चापि हेतुतः ॥

इत्यय महत्त्वयुक्त श्लोक कथं न गृहीतस्तत्र ज्ञायते । अस्तु ।

अनेन प्रकारेण अतिवृद्धमेधया अयं सङ्क्षेपं न परीक्ष्य । महाभारतीय महत्त्वयुक्तप्रसङ्गांस्तत्प्रसङ्गानुरोधेन कृतं महत्त्वयुक्तं रोधं च न परित्यज्य महाभारततसारसर्वस्वस्य अस्मिन् सङ्क्षेपे सत्त्वात्, येषां समग्रमहाभारत-वाचनाय समयानुकूल्यं न विद्यते, ते अस्य महाभारतसारस्य वाचनेन समग्रमहाभारतवाचनफलं लभेरन्नेव ।

महाभारतीयकथानां पुरातनत्वेऽपि तासु वर्णितं तत्त्वज्ञानं पुराणमित्येव न त्याज्यं भवितुमर्हति। 'प्रतिक्षणं यन्नवतामुपैति' इति कालिदासोक्तलक्षणं यथा सौन्दर्यस्य तथा महाभारतीयतत्त्वज्ञानस्यापि भवेत्। महाभारतीयतत्त्व ज्ञानं जीर्णं पर्युषितं च नास्त्येव, प्रत्युत नवनवाविष्कारदृष्ट्या यदि तत्परी क्ष्येत तर्हि नव्यतरमिव सम्पद्येत । " तस्मात्पश्यन्ति पादपा ", " तस्मा च्छृण्वन्ति पादपा " इत्यादिमहाभारतीयवाक्यानामर्थं पूर्वमसम्भ वनीय इव प्रतिभाति स्म। परं सर जगदीशचन्द्रबोसमहाशयानां प्रयोगै यदा स एवार्थः प्रत्यक्षसिद्धः तदा अहो व्यासमहर्षिणा अयमर्थः पूर्वमेव ज्ञात आसीत् इति प्रत्ययेन तद्वाक्यार्थं संशयरहितं चेतः सविस्मयमभवत्।

नवीनमिव भासमानं ज्ञानं महाभारतवाचनेन पुरातनमस्मदीयं चेति यथा प्रतीयते तथैव तद्वाचनेन अन्योऽपि लाभो भवति । समाजस्वास्थ्यस्य साम्यवादस्य च आपाततरमणीयाः कल्पनाः मनोमोहमुत्पादयन्ति तासां मतमनुभवेनैव त्याज्यत्वं निश्चितमिति महाभारतवाचनेन सूच्यते । मानव समाजः एकवर्णो वर्णविहीनो वा कर्तव्य इति प्रतिपादनं केचित्साम्प्रतं निर्बन्धेन कुर्वन्ति । परं वर्णव्यवस्थायाः प्राक् समाजो वर्णविहीन एवा सीत्। तस्यामवस्थायां समाजोत्कर्षः अशक्यः सञ्जातः । तेन दुरनुभवेन वर्णव्यवस्थानिर्माणमावश्यकमभूत्। तस्मात् यः पन्था प्रामादिकः श्रेयो विरोधी च अनुभवेन निश्चितः तदालम्बनानर्बन्धः भूतपूर्वपाते गर्ते पुन - पतननिर्बन्धश्च समान एवेति महाभारतवाचनेन प्रतीयते ।

इदं तात्त्विकविवेचनं त्यक्त्वा राजनीतिशास्त्रनियमविचारे कृते तदेव प्रतीयते । साम्प्रतं लोकतन्त्रराज्यस्य सर्वत्र प्रशंसा श्रूयते । परं विचारा नन्तरमिदं सम्मतं स्यात् यत् तज्ज्ञकृतनियमानुसारिणी राज्यपद्धतिरेव अन्ते

सुखावहा चिरस्थायिनी च भवेत्। राज्यस्य समाजस्य च आर्थिकसुस्थितिलाभार्थं साम्प्रतं नानाविधा उपायाः सूच्यन्ते। तेषूपायेषु धनिकवादस्य उपयुक्ततायाः का मर्यादा, राज्यशासनेन के कराः किंप्रमाणेन कदा ग्राह्याः, यातायातव्यापारे कानि बन्धनानि उपकारकाणि कानि च अपकारकाणि, मूल्यनियंत्रणं कथं कर्तव्यम्, अनाथापाङ्गानां धारणपोषणं केन कथं च कर्तव्यमित्याद्यनेकप्रश्नानामनुभवसिद्धानि उत्तराणि महाभारते प्राप्यन्ते।

एवमेव समाजजीवने व्यक्तिमात्रस्य सन्मार्गाश्रयणे च शासनेन विधानतः परिवर्तनं कियत्पर्यन्तं करणीयं, समाजस्य सन्मार्गावलम्बनार्थं फलदायि साधनं विधानं वा धर्मो वा विद्यते, इत्यस्य सूक्ष्मविचारानन्तरं द्वयोः समन्वयः कथं कर्तव्यः तदपि महाभारते वर्णितमस्ति। केवलेन विधानेनेव केवलेन धर्मेणापि न व्यवहारसिद्धिर्भवति। अतः द्वयोर्यथाप्रमाण समन्वयः कर्तव्यः। न केनापि विधानेन धर्मविरोधिना भाव्यं, न केनापि धर्मेण च व्यवहारविरोधिना भाव्यमित्ययमेव निष्कर्षः महाभारतवाचनेन मनसि सुस्थिरो भवति। इमं निष्कर्षं हृदयङ्गमं कृत्वा यदि भारतस्य आधुनिकशासका वर्तिष्यन्ते तर्हि तेषां धर्महीनविधानानामीदृशी दुरवस्था न भविष्यति।

वैज्ञानिकैरणुसंशोधनेन हैड्रोजनास्त्रं सिद्धं कृतम्। परमिदानीं सर्वे महामन्त्रिणः तन्नियन्त्रणं कथं कर्तव्यमिति विचारेण स्वमस्तिष्कमायासयन्ति। धर्मबन्धनं विना इदं कार्यं कथ सिद्ध्येत्। महाभारतसमये ईदृशमेव सर्वसंहारकं नारायणास्त्रमवगतमासीत्। तज्ज्ञानवतापि अर्जुनेन धर्मभावनामनुसृत्य तत्प्रयोगो न कृतः। तामसवृत्तिमता अश्वत्थाम्ना कृतेन तत्प्रयोगेण महाननर्थः सञ्जातः तस्य दुष्परिणामश्च तेनैव अनुभूतः। अनेन प्रसङ्गेन महानुपदेशः सर्वैर्ग्राह्यः। प्रतिराष्ट्रं चारप्रचारेण हैड्रोजनास्त्रनियन्त्रणं न भविष्यति। मानवेषु तत्प्रयोगः अधार्मिक इति बुद्धिर्यदि स्यात्, यदि च स्वराष्ट्रस्यापि तेन नाशो भवेदिति निश्चयः स्यात्तर्हि मानवसमाजो निर्भयो भविष्यति। अस्तु।

महाभारतनामकः सदुपदेशरत्नपूरितो महासागरोऽस्ति। तस्य सर्वरत्नानि ग्रहीतुं न कोऽपि शक्नोति। तथापि जलावगाहकानां यथाशक्ति रत्नलाभार्थं केषुचिदुपसागरेषु व्यवस्था क्रियते। महाभारतमहासागरस्य

महाभारतसारः उपसागरो विद्यते। ये अगाधे महासागरे निमज्ज्य रत्नग्रहणे असमर्थाः, तेषां कृते इदं महाभारतसाराख्यं निर्भयस्थानं निर्मितमस्ति। येषां सकाशे वाचनार्थं स्वल्प एव समयोऽस्ति, येषां संस्कृतभाषाध्ययनमपूर्णं विद्यते, येषां च समग्रमहाभारतग्रन्थक्रयणे आर्थिकसामर्थ्यं नास्ति तेषां वाचकानामयं महाभारतसारग्रन्थः मनःसमाधानाय कल्पेत।

॥ श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रन्थकोटिभिः ॥ इत्युक्त्वा

॥ परोपकारः पुण्याय पापाय परपीडनम् ॥

इति श्लोकार्धेन सम्पूर्णमहाभारतसारो वर्ण्यते यद्यपि तथापि सा अतिशयोक्तेः परा काष्ठा अभूत्। यदि तस्य श्लोकार्धस्य वाचनेन पठनेन च सर्वेषां मनांसि सुसंस्कृतानि अभविष्यन् तर्हि विस्तृतग्रन्थप्रणयनमनावश्यकमभविष्यत्। तथा सति व्यासमहर्षिणा वर्षत्रयपर्यन्तं जागरूकतया जयग्रन्थनिर्मितिः न कृता स्यात्। वैशम्पायनेन सौतिना च स्वकृतप्रक्षेपेण मूलग्रन्थस्य इयती वृद्धिरपि न कृता स्यात्।

तस्मिन्समये अयं ग्रन्थवर्धनोद्योगः आवश्यको भवेत्। परं सद्यःपरिस्थितिं दृष्ट्वा, "अनन्तपारं किल शास्त्रवृन्दं स्वल्पं तथायुर्बहवश्च विघ्नाः" इति वचनमनुसृत्य अस्य ग्रन्थस्य सम्पादकैः समुचितमर्यादां निश्चित्य सङ्क्षेपः कृतोऽस्ति। तस्याय प्राथमिकपर्वपञ्चकसङ्क्षेपात्मकः प्रथमो भागः साम्प्रतं प्रकाश्यते। इदं कार्यं यदि वाचकानां सम्मतं स्यात्तर्हि द्वितीयभागोऽपि सत्वरं प्रकाशितो भविष्यति।

तस्य द्वितीयभागस्य प्रकाशनात्पूर्वमेव एका सूचना अवश्यं करणीयेति भाति। इयमेव सा यत् मुख्यकथायाः उपकथाः न पृथक्करणीयाः। ता यत्रस्थास्तत्रैव देयाः। तेन प्रकरणभङ्गो न भवति मुख्यकथा च सुस्पष्टा भवति। परिशिष्टे उपकथादानेन कस्मिन्प्रकरणे सा कथितेति न ज्ञायते। तेन तस्या महत्त्वमपि न चित्तारूढं भवति। उपकथानां पृथक्करणेन मुख्यकथाया विचारधारा खण्डिता भवति विसङ्गतिश्च जायते।

आदिपर्वणि शकुन्तलाख्यानं ययात्युपाख्यानं च न उपकथास्वन्तर्भूतं किन्तु वंशवर्णनात्मकमुख्यकथायाः आवश्यकभाग एव सः। सभापर्वणि जरासन्धस्य शिशुपालस्य च जन्मवधकथयोरच्छेद्यः सम्बन्धो दृश्यते। तस्मात्ता उपकथाः तत्तत्स्थले एव दत्ताश्चेत्तत्समीचीनमभविष्यत्।

